20140723162839 6423

**माथेरान, पाचगणी, लोणावळा, पन्हाळा, महाबळेश्वर या गिरीस्थान नगरपरिषदांनी पर्यटन मार्गदर्शक / शिपयांचा पगार व लिपिकाचे विशेष वेतन इत्यादी स्वरुपात केलेल्या खर्चाचा परतावा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

शासन निर्णय क्र. टीडीपी - २०१२/१/प्र.क्र ५८/पर्यटन,
पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
दिनांक : ९ मार्च, २०१२

वाचा : शासन निर्णय क्र. सामान्य प्रशासन विभाग क्र. डोटीटी/३५६५/२७५५/डो. दिनांक ११/१/१९६५

**शासन निर्णय :** पर्यटन केंद्र उभारणे या योजनेतंर्गत प्रत्येकी एका पर्यटन मार्गदर्शक/शिपायाचा पगार व एका लिपिकाचे विशेष वेतनासाठी केलेल्या खर्चाचा परतावा करण्याकरीता सन २०११-१२ या आर्थिक वर्षात रुपये १६५०००/- (रुपये : एक लाख पासष्ट हजार फक्त) च्या नियतव्ययास मंजूरी देण्यात आली असून खालील प्रमाणे अनुदान अदा करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

| **नगर परिषद** | **खर्चाचे वर्ष** | **खर्चाचा परतावा (रुपये)** | **खालील नावे धनादेश काढावेत.** |
|---|---|---|---|
| १) माथेरान नगर परिषद, जिल्हा रायगड | २०१०-११ | २२००० | मुख्याधिकारी, माथेरान नगर परिषद, जिल्हा रायगड (The Chief Officer, Matheran Hill Station Municipal Council, Dist. Raigad) |
| २) पांचगणी नगर परिषद, जिल्हा सातारा | २०१०-११ | ३८००० | मुख्याधिकारी, पांचगणी नगर परिषद, जिल्हा सातारा (The Chief Officer, Panchgani Hill Station Municipal Council, Dist. Satara) |
| ३) लोणावळा नगर परिषद, जिल्हा पुणे | २०१०-११ | २६००० | मुख्याधिकारी, लोणावळा नगर परिषद, जिल्हा पुणे (The Chief Officer, Lonavala Hill Station Municipal Council, Dist. Pune) |
| ४) पन्हाळा नगर परिषद, जिल्हा कोल्हापूर | २०१०-११ | ३६००० | मुख्याधिकारी, पन्हाळा नगर परिषद, जिल्हा कोल्हापूर (The Chief Officer, Panhala Hill Station Municipal Council, Dist. Kolhapur) |
| ५) महाबळेश्वर नगरपरिषद, जिल्हा सातारा | २०१०-११ | ४३००० | मुख्याधिकारी, महाबळेश्वर नगर परिषद, जिल्हा सातारा (The Chief Officer, Mahabaleshwar Hill Station Municipal Council, Dist. Satara) |
| | **एकूण** | **१६५०००** | |

२.	परिच्छेद क्रंमाक १ मध्ये मंजुर करण्यात आलेल्या सहाय्यक अनुदानाची रक्कम संबंधीताना वितरीत करण्यासाठी श्री. आ.बा.डमाळे, कार्यासन अधिकारी, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ३२ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून व श्रीमती. स्वाती म्हसे, उप सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात आले आहे.

३.	या सहाय्यक अनुदाना वरील खर्च रु. १,६५,०००/- (रुपये : एक लाख पासष्ट हजार फक्त) मागणी क्र.झेडडी-४,लेखाशिर्ष३४५२-पर्यटन, ०१-पर्यटनासाठी पायाभूत सुविधा,१०१ पर्यटन केंद्रे,०१ -पर्यटन केंद्रे (योजनेतर) (०१)(०१) पर्यटन केंद्र उघडणे (३४५२ १९९ ४) ३१, सहाय्यक अनुदाने, योजनेतर या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा, व तो सन २०११-१२ वर्षासाठी मंजूर असलेल्या आर्थिक तरतूदीतून भागविण्यात यावा.

४.	हा शासन निर्णय हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-एक, शासन निर्णय क्र. विअप्र१०.०८/प्र.क्र.७०/२००८, दिनांक १५ मे २००९ मधील अनु. क्र. २७ नियम क्र. १४९ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारातंर्गत तसेच वित्त विभाग अनोपचारिक संदर्भ क्रमांक ४७ दिनांक २९/०२/२०१२ अन्वये सहमतीने व सल्लाने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने

**(आ. बा. डमाळे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

महालेखापाल, महाराष्ट्र - १, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र - २, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
महालेखाकार, (स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा), मुंबई
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
मुख्याधिकारी, माथेरान नगर परिषद, जिल्हा रायगड
मुख्याधिकारी, पांचगणी नगर परिषद, जिल्हा सातारा
मुख्याधिकारी, लोणावळा नगर परिषद, जिल्हा पुणे
मुख्याधिकारी, पन्हाळा नगर परिषद, जिल्हा कोल्हापूर
मुख्याधिकारी, महाबळेश्वर नगर परिषद, जिल्हा सातारा
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
वित्त विभाग (का.व्यय-१४/अर्थोपाय) मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती,